**अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०२१.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१/१६-ब, दि.१५.६.२०२०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७.११.२०२०

**प्रस्तावना :**

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दि.६ जुलै, २०१७ रोजीच्या निर्णयाची तसेच मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांच्या दि.२८.९.२०१८ च्या आदेशाची राज्यात अंमजबजावणी करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये खालील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करुन त्यांना ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवा निवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नेमणूक देण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

(अ) अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले अधिकारी/ कर्मचारी

(ब) अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागासवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले अधिकारी/ कर्मचारी

(क) अनुसूचित जमातीचा दावा सोडून दिलेले अधिकारी/ कर्मचारी

(ड) नियुक्तीनंतर जात प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी विहित मुदतीत जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव सादर न केलेले अनुसूचित जमातीचे अधिकारी व कर्मचारी

(इ) ज्या अधिकारी व कर्मचाऱ्यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात मा.न्यायालयात याचिका दाखल केल्या असतील मात्र त्यांच्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने किंवा मा.सर्वोच्च न्यायालयाने जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या समितीच्या निर्णयास कोणतीही स्थगिती दिली नसेल असे अधिकारी व कर्मचारी

२. अधिसंख्य पदावर नेमणूक दिल्यानंतर अशा कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत चालू ठेवाव्यात किंवा कसे तसेच त्यांना अनुज्ञेय करावयाच्या सेवा विषयक/सेवा निवृत्तीविषयक लाभांबाबत सविस्तर अभ्यास करुन शासनास शिफारशी करण्यासाठी मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र.२ येथील दि.१५.६.२०२० च्या शासन निर्णयान्वये अभ्यास गट स्थापन करण्यात आला आहे.

३. सदर अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त न झाल्याने दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या कर्मचाऱ्यांचा ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवा निवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

४. अभ्यास गटाचा अहवाल शासनास प्राप्त झाल्यानंतर त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होण्यास काही कालावधी लागणार आहे. अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या कर्मचाऱ्यांच्या ११ महिन्याच्या मुदतवाढीचा कालावधी दि.३१.१०.२०२१ रोजी संपुष्टात येत असल्याने त्या नियुक्त्यांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर मुदतवाढ देण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना, त्यांच्या अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व क्षेत्रिय कार्यालयांना/ आस्थापनांना योग्य ते आदेश तातडीने निर्गमित करुन या आदेशाची तातडीने अंमलबजावणी करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११०२८१५०६५७७१०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=41d02a5c663d2c05d362d4847bea4a1874fda4e9cb60284fb102fd7b9b3891b3, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2021.11.01 13:34:07 +05'30'

**(र. अ. खडसे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा.सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

५) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा
७) सर्व विधान सभा सदस्य/ विधान परिषद, सदस्य
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
९) मा.अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा)
११) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद)
१२) सर्व विभागीय आयुक्त
१३) सर्व सहायक आयुक्त (मागास वर्ग कक्ष)
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
१७) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१८) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, नागपूर, औरंगाबाद
२०) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग
२१) सचिव, राज्य निवडणूक आयोग
२२) सचिव, राज्य माहिती आयोग
२३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२४) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
२५) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
२६) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा, नगरपालिका
२७) संचालक,  समाजकल्याण, पुणे
२८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२९) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
३०) संचालक, सेवायोजन, मुंबई
३१) निवडनस्ती.